रायगड किल्ला व परिसर पर्यटन विकास आराखड्यासाठी सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात निधी वितरीत करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग
शासन निर्णय क्रमांक : राविप्रा २०२१/प्र.क्र.१६/ सां.का.३
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १९ जुलै, २०२३

**वाचा** :- १) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र.टीडीसी-२०१६/३/प्र.क्र.२२९/ पर्यटन, दिनांक ३१.०३.२०१७
२) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र.टीडीएम-२०१७/१०/प्र.क्र.९८४/ पर्यटन, दिनांक २०.१२.२०१७
३) शासन पत्र पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र.बैठक-२०२२/प्र.क्र.०५/सां.का.३, दि.२३.०२.२०२२
४) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र.राविप्रा २०२१/प्र.क्र.१६/ सां.का.३, दि. ३१.०३.२०२२
५) शासन पत्र पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र.बैठक-२०२२/प्र.क्र.०५/सां.का.३, दि.३१.०३.२०२२
६) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र.राविप्रा २०२१/प्र.क्र.१६/ सां.का.३, दि. २८.०३.२०२३
७) जिल्हाधिकारी, रायगड यांचे पत्र क्र. साप्र/कार्या-१/रायगड किल्ला/२०२३-२४/२०२३, दि.१८.०७.२०२३

**प्रस्तावना :-**

रायगड जिल्ह्यातील रायगड किल्ला व परिसर पर्यटन विकासासाठी रु.६०६.०९ कोटी रकमेच्या आराखड्यास संदर्भाधीन क्र.१ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. त्याचप्रमाणे संदर्भाधीन क्र.२ च्या शासन निर्णयान्वये सदर आराखड्यासाठी रायगड किल्ला व परिसर विकास पर्यटन आराखडा प्राधिकरण स्थापन करण्यात आले आहे. सदर आराखडयातील कामांसाठी जिल्हाधिकारी रायगड यांना आतापर्यंत एकूण रक्कम रू.१३२.०२ कोटी इतका निधी वितरीत करण्यात आली आहे.

रायगड किल्ला व परिसर विकास आराखडयाकरीता सन २०२३-२४ या आर्थिक वर्षातील रू.१०.०० कोटी इतका निधी अर्थसंकल्पीत झाला असून त्यापैकी रू.३.०० कोटी इतका निधी विभागास उपलब्ध झाला आहे. जिल्हाधिकारी रायगड यांनी संदर्भाधीन क्र.७ अन्वये रु.३.०० कोटी इतका निधी वितरीत करण्याची विनंती केली आहे. त्यानुसार सदर निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

०१. या शासन निर्णयान्वये रायगड किल्ला व परिसर विकास पर्यटन आराखड्यातील कामांकरीता आवश्यक रू.३,००,००,०००/- (अक्षरी रूपये तीन कोटी फक्त) इतका निधी जिल्हाधिकारी, रायगड यांना वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

०२. यासाठी होणारा खर्च मागणी क्र.झेडडी-२ २२०५- कला व संस्कृति, (१०३) पुरातत्वशास्त्र, (०१) (०३) रायगड किल्ला व परिसर विकास आराखडा २२०५ ३७४२ (कार्यक्रम) ५० इतर खर्च या लेखाशिर्षातून सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात यावा.

०३. या प्रकरणी मंजूर करण्यात आलेली रक्कम आहरण करून संबधितांना वितरीत करण्याकरीता संबधित सहायक जिल्हा नियोजन अधिकारी/ जिल्हा नियोजन अधिकारी यांना "आहरण व संवितरण अधिकारी" व संबधित जिल्हाधिकारी यांना "नियंत्रण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. नियंत्रण अधिकारी यांचा कोड ०००२८ असा आहे. सदर निर्णयानुसार मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाची रक्कम त्यांनी संबधित जिल्हा कोषागार कार्यालयात देयके सादर करून संबधितांना वितरीत करण्यात यावे. सदर कार्यवाहीबाबतचा अनुपालन अहवाल शासनास सादर करण्यात यावा.

०४. सदर निधी अखर्चित राहणार नाही याची काळजी जिल्हाधिकारी, रायगड यांनी घ्यावी. तसेच संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये मंजूर आराखड्यातील कामांसाठी खर्च करण्यात यावा. या आराखड्यात मंजूर कामाव्यतिरीक्त इतर कोणत्याही प्रयोजनासाठी सदर निधी खर्च होणार नाही याचीही दक्षता जिल्हाधिकारी, रायगड यांनी घ्यावी. तसेच आराखड्यातील कामाच्या प्रगतीचा नियमितपणे द्विमासिक अहवाल शासनास सादर करण्यात यावा.

०५. हा शासन निर्णय विअप्र -२०१३/ प्र.क्र.३०/ २०१३/ विनियम, भाग २, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला, उपविभाग तीन मधील अनुक्रमांक ४ मधील परिच्छेद क्र. २७ (२) "अ" नुसार तसेच वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल २०२३ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकाराच्या अधिन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०७१९१६५०३८०७२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUMANT DINKAR PASHTE

Digitally signed by SUMANT DINKAR PASHTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=58694d4cd2bd16f0ab6514fc8598a9aa217e2508455856a701adb1bb6ef9b120, pseudonym=565ADED7321B71A5B0327BA1F7149AED1F618E4E, serialNumber=AFC006DAAE95D0F2CF7C7F09CA18CF0C9C9363A05E6070B1C03455CF1CB43586, cn=SUMANT DINKAR PASHTE
Date: 2023.07.19 16:52:12 +05'30'

**( सु. दि. पाष्टे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.मंत्री (सांस्कृतिक कार्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव (सांस्कृतिक कार्य) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
५. उप सचिव (सां.का.३) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
६. जिल्हाधिकारी, रायगड
७. संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
८. महालेखापाल -१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य ,मुंबई
९. महालेखापाल -२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य , नागपूर

१०. महालेखापाल -१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य ,मुंबई
११. महालेखापाल -२ (लेखा परीक्षा ,(महाराष्ट्र राज्य , नागपूर
१२. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१३. जिल्हा कोषागार अधिकारी, रायगड
१४. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,मंत्रालय, मुंबई (यांना आदेशात नमूद करण्यात आलेल्या संबधित नियंत्रण अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय यांच्याकडे निधी वितरीत करण्याच्या विनंतीसह)
१५. निवड नस्ती, सां.का.३.